सन २०२४-२५ मधील अर्थसंकल्पिय तरतूदीचे वितरण करणेबाबत राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचनेअंतर्गत प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थांचे सक्षमीकरणासाठी सहाय्य (२४२५ २५१५)

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र.अर्थसं ०९२४/ प्र.क्र.२१३ /१८-स**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :- ३१ मार्च, २०२५**

**वाचा :-**

१. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय, क्रमांक सीसीआर ०३१३/प्र.क्र.१४४/२-स, दिनांक ०६/०९/२०१४ व दि. ०२.०८.२०१७.

२. वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा-प्रशा ५, दि.१०/०५/२०१६

३.सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय, क्रमांक संकीर्ण-०९१९/प्र.क्र.१०६/१८-स, दिनांक १६/११/२०२१

४. वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१/०४/२०२४

५. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय, क्रमांक अर्थसं-०६२३/प्र.क्र.१४१/१८-स, दिनांक २१/०३/२०२४.

**प्रस्तावना :-**

संदर्भांकित शासन निर्णय क्र.१ अन्वये राज्य शासनाने राज्यातील शेतक-यांना पीक कर्ज पुरवठा होण्यासाठी प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थांचे सक्षमीकरण करण्यासाठी शासनामार्फत पीक कर्ज वाटपाच्या प्रमाणात अर्थसहाय्य करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. या संस्थांनी प्रत्येक आर्थिक वर्षात केलेल्या कर्ज पुरवठ्याच्या प्रमाणात ०.७५ % ते २ % अर्थसहाय्य देण्याचा निर्णय संदर्भाधीन शासन निर्णय क्र. ३ अन्वये शासनाने घेतला आहे. अर्थसहाय्य देण्यात येणा-या प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थांनी शासन निर्णयात नमूद केलेल्या अटी/निकषांची पूर्तता करणे बंधनकारक आहे.

राज्य शासनाच्या धोरणास अनुसरुन, सन २०२४-२५ या चालु आर्थिक वर्षासाठी राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचनेअंतर्गत प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थांचे सक्षमीकरण करण्यासाठी अर्थसहाय्य (लेखाशीर्ष २४२५ २५१५) या योजनेअंतर्गत निधी मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२४-२५ या वर्षात राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचनेअंतर्गत प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थांचे सक्षमीकरण (लेखाशिर्ष २४२५ २५१५) या योजनेअंतर्गत सुधारीत अंदाजास अनुसरुन रु. २१ कोटी अर्थसंकल्पिय तरतूद असून त्यापैकी रु. १८ कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. उर्वरीत रु. ३ कोटी निधी वितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१/०४/२०२४ मधील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची सदर प्रकरणी पूर्तता होत आहे.

३. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेला निधी संबंधितांना वितरीत करताना आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर रकमेबाबत उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त करून घ्यावे व त्याची प्रत शासनास सादर करावी.

४. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी वित्त विभागाच्या उपरोक्त वाचा क्र. ४ येथील शासन परिपत्रकामधील सूचनांचे पालन करावे.

५. सदर तरतूद संबंधित संस्थांना अदा करण्यासाठी संबंधीत जिल्ह्याचे जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था अधिन जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था / जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी आहरण करून हा खर्च वेळेत होईल हे सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पहावे. तसेच याबाबतचा अहवाल व विकास मंडळनिहाय खर्चाची माहिती वेळोवेळी शासनास सादर करावी.

६. सदरहू रक्कम मागणी क्र.व्ही - २ मुख्यलेखाशिर्ष " २४२५ सहकार - (१०७), सहकारी पत संस्थांना सहाय्य (०१)(०२) राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचनेअंतर्गत प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थांचे सक्षमीकरणासाठी सहाय्य (कार्यक्रम) (दत्तमत) (२४२५ २५१५) ३३, अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखालील सन २०२४-२५ या वर्षासाठी उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून सदर रक्कम खर्च करण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक अनौ.सं.क्र.१०१/ का.१४३१, दिनांक २१.२.२०२५ अन्वये तसेच वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक अनौ.स.२७८/२०२५/व्यय-२, दिनांक २८.३.२०२५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८.	सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३३११७१६२२४३०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANTOSH ARUN PATIL

Digitally signed by SANTOSH ARUN PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=ca78467bcc4594e1e11741a7962a7a83feafb176442575037160fc343c4ae5ab, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E52439642AB57C332B2A3E3E46F0D907BA6167409EF6D52C943BF775ECF042FD, cn=SANTOSH ARUN PATIL
Date: 2025.03.31 17:17:06 +05'30'

**( संतोष पाटील)**
**अपर निबंधक तथा सह सचिव,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत माहितीसाठी व योग्य त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित** :-

१. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.उपमुख्यमंत्री (नगर विकास)यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. उपुख्यमंत्री (वित्त) यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. महालेखाकार, महाराष्ट्र- १, मुंबई.
९. महालेखाकार, महाराष्ट्र- २, नागपूर.
१०. समन्वयक, राज्यस्तरीय बँकर्स समिती, बँक ऑफ महाराष्ट्र, पुणे.
११. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक, लि. मुंबई.
१२. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, (सर्व)
१३. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, (सर्व)
१४. वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प-१३, मंत्रालय, मुंबई.
१५. अवर सचिव (कार्या. १७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. कोषागार अधिकारी, पुणे.
१७. निवड नस्ती-१८-स.